**विभागीय आयुक्त, अमरावती कार्यालयाकरीता महसूल सज्जावरील तलाठ्यांच्या कार्यालयीन वापराकरीता घेतलेल्या खाजगी जागांच्या भाड्याच्या थकबाकी अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.भाडेवाढ-२०१८/प्र.क्र.४५५/ई-१०,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक : २१ फेब्रुवारी, २०१९**

वाचा :- (१) शासन निर्णय क्र.भाडेवाड/२०११/प्र.क्र.२८२/ई-१०, दि. ०५ जून, २०१३
(२) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र./अ.का./बजेट/पुरवणी मागणी/ २०१७-१८/प्र.क्र.२०७१/२०१८, दि.१८.०९.२०१८
(३) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र./अ.का/बजेट/पुरवणी मागणी/ २०१८-१९/प्र.क्र.१४५/२०१८, दि.२९.१२.२०१८

**प्रस्तावना :-**

महसूल व वन विभाग दि. ०५ जून, २०१३ च्या शासन निर्णयान्वये, महसूल सज्जांवरील तलाठ्यांच्या मुख्यालयी कार्यालयीन वापराकरीता घेतलेल्या खाजगी जागांच्या भाड्यांच्या रक्कमेत वाढ करुन नविन भाडे मंजूर करण्यात आले आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त, अमरावती कार्यालयाकरीता महसूल सज्जावरील तलाठ्यांच्या कार्यालयीन वापराकरीता घेतलेल्या खाजगी जागांच्या भाड्याच्या थकबाकीची रु.५,१३,२६,७८९/- (पाच कोटी तेरा लाख सव्वीस हजार सातशे एकोणनव्वद फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास खर्चास मान्यता देण्यात आलेली आलेली आहे. त्यानुषंगाने सदर मंजूरीच्या अनुषंगाने निधी वितरण करण्याची बाबा शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय आयुक्त, अमरावती कार्यालयाकरीता महसूल सज्जावरील तलाठ्यांच्या कार्यालयीन वापराकरीता घेतलेल्या खाजगी जागांच्या भाड्याच्या थकबाकीची रु.५,१३,२६,७८९/- (पाच कोटी तेरा लाख सव्वीस हजार सातशे एकोणनव्वद फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देत आहे.

२. या प्रयोजनासाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.सी-१ २०५३§०३४२, जिल्हा प्रशासन (००) ०९३ जिल्हा आस्थापना (०३) ग्राम अधिकारी आस्थापना (०३) (०४) विभागीय आयुक्त, अमरावती दत्तमत (२०५३०३४२) १४- भाडेपट्टी व कर या लेखाशीर्षाखाली सन-२०१८-१९ या वित्तीय वर्षात मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.निरंक दिनांक २१.०१.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१९०२२११७१५०८७९१९ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2019.02.21 17:17:05 +05'30'

**(डॉ. संतोष भोगले)**
**सह सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
२) महालेखापाल-१ /२ (लेखा परीक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
३) जिल्हाधिकारी, अमरावती / अकोला / यवतमाळ / वाशिम / बुलढाणा
४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती / अकोला / यवतमाळ / वाशिम / बुलढाणा
६) वित्त विभाग ( आ.पु.क. / व्यय-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७) अवर सचिव (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई